

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
मंत्रालय (विस्तार), दालन क्र.५५७, ५ वा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मुंबई-४०० ०३२.

दूरध्वनी क्रमांक-२२७९३३४४ Email ID : desk14gad-mh@gov.in

.........................................................................................................................

**स्मरणपत्र**

क्रमांक: संकिर्ण-२०२१/प्र.क्र.१३४/का.१४ दिनांक : १० फेब्रुवारी, २०२२.

प्रति,

सह /उप सचिव,
सर्व मंत्रालयीन विभाग (आस्थापना),
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

**विषय** : राज्य निवडणूक आयोग, महाराष्ट्र यांच्या मुंबई कार्यालयातील “अवर सचिव, कक्ष अधिकारी व सहायक कक्ष अधिकारी” ही पदे प्रतिनियुक्तीने भरण्याबाबत.

**संदर्भ:** शासन समक्रमांक दि.०३.११.२०२१ रोजीचे पत्र.

महोदय/ महोदया,

उपरोक्त संदर्भाधीन पत्रान्वये, राज्य निवडणूक आयोग, महाराष्ट्र यांच्या मुंबई कार्यालयातील अवर सचिव (१ पद), कक्ष अधिकारी (१ पद) व सहायक कक्ष अधिकारी (२ पदे) ही पदे मंत्रालयीन संवर्गातून प्रतिनियुक्तीने भरण्याबाबत इच्छूकता मागविण्यात आली होती. मात्र सदर पदासाठी अदयापही इच्छूकता किंवा कोणीही अधिकारी/कर्मचारी इच्छूक नसल्याबाबत विभागाकडून “निरंक” अशी माहिती प्राप्त झालेली नाही.

२. त्यानुषंगाने सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना विनंती करण्यात येते की, राज्य निवडणूक आयोग यांच्या मुंबई या कार्यालयातील “अवर सचिव, कक्ष अधिकारी व सहायक कक्ष अधिकारी” या पदावर प्रतिनियुक्तीने जाण्यासाठी इच्छुक असलेल्या आपल्या विभागातील अधिकारी/कर्मचारी यांची नावे, त्यांचे मागील पाच वर्षांच्या गोपनीय अहवालांच्या प्रमाणित प्रतींसह, वैयक्तिक माहिती (Bio-data), संपूर्ण सेवा तपशील (कालावधी, विभाग, पद), ना-विभागीय चौकशीचे प्रमाणपत्र व विभागाचे ना-हरकत प्रमाणपत्र इ. माहिती या विभागाकडे दि.१६.११.२०२१ पर्यंत निश्चितपणे प्राप्त होतील अशा रितीने पाठविण्यात यावी. तसेच कोणीही अधिकारी इच्छुक नसल्यास “निरंक” असेही या विभागास कळवावे, ही विनंती.

३. सदर पत्राची प्रत महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आली असून त्याचा संगणक संकेतांक २०२२०२१११५५७३८११०७ असा आहे. सदर पत्र डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

आपला,

Gajanan Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, serialNumber=54b11b1ccbdc577d71dce3b313c3fef5dc2ad659e360f73b682d6b6fccb8aecf, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2022.02.11 15:59:34 +05'30'

**( ग. भि. गुरव )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत- निवडनस्ती सा.प्र.वि./कार्यासन-१४**

# <u>विवरणपत्र</u>

| अ.क्र. | मुद्दा | तपशिल/अभिप्राय |
|---|---|---|
| १ | अधिकारी/ कर्मचाऱ्यांचे संपूर्ण नाव | |
| २ | जन्मदिनांक | |
| ३ | शैक्षणिक अर्हता | |
| ४ | स्थायित्व प्रमाणपत्र | |
| ५ | भ्रमणध्वनी क्रमांक | |
| ६ | मागील ५ वर्षाच्या गोपनीय अहवालाच्या छायाप्रती (मूळ गोपनीय अहवाल पाठवू नयेत.) | |
| ७ | मत्ता व दायित्वे सादर केली आहेत का? | |
| ८ | ५०/५५ व्या वर्षी पुनर्विलोकन केले आहे का? (लागू असल्यास) | |
| ९ | संबंधित अधिकाऱ्याला यापूर्वी प्रतिनियुक्ती दिली असल्यास तपशील (पद व कालावधी) (प्रतिनियुक्तीचा एकूण कालावधी १० वर्षापेक्षा जास्त नसावा) | दिनांकापासून ते दिनांकापर्यंत / पद /प्रतिनियुक्तीचे ठिकाण<br>एकूण कालावधी |
| १० | मागील प्रतिनियुक्तीवरून परत आल्याच्या दिनांकापासून ५ वर्षे पूर्ण झाली आहेत का? | |
| ११ | संबंधित अधिकाऱ्यांविरूध्द विभागीय चौकशी सुरू अथवा प्रस्तावित आहे काय? | |
| १२ | प्रतिनियुक्तीकरीता निवड झाल्यास विभाग कार्यमुक्त करेल किंवा कसे. | |